




**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
मंत्रालय विस्तार इमारत, दालन क्र.५५७, ५ वा मजला
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दूरध्वनी क्रमांक-०२२-२२७९४२५७ Email ID : Desk14b.gad-mh@gov.in

**<u>प्रशिक्षण/सर्वप्राथम्य</u>**

क्रमांक : कअनि-११२५/प्र.क्र.३४/प्रशा-२ दिनांक:- ०४ जून, २०२५

**प्रति,**

सह सचिव/उप सचिव (आस्थापना)
महसूल व वन विभाग/वित्त विभाग/कृषि व पदुम विभाग/उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई

**विषय:-राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत सन २०२५ मधील प्रशिक्षण कक्ष अधिकारी (गट ब) यांचे पदोन्नतीनंतरचे प्रशिक्षण नामनिर्देशित कक्ष अधिकाऱ्यांचे प्रशिक्षणातून नाव वगळणेबाबत**

**संदर्भ:**- शासन पत्र समक्रमांक दिनांक ०८.०५.२०२५

**महोदय/महोदया,**

उपरोक्त संदर्भाधीन पत्रान्वये कक्ष अधिकारी पदावर पदोन्नत झालेल्या व पदोन्नतीनंतरच्या प्रशिक्षणासाठी पात्र असलेल्या कक्ष अधिकाऱ्यांसाठी **डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती येथे दिनांक १९.०५.२०२५ ते दिनांक ३०.०५.२०२५ या कालावधीमध्ये ०२ आठवड्यांचे** पदोन्नतीनंतरचे प्रशिक्षण आयोजित करण्यात आले होते.

२. सदर प्रशिक्षणाकरीता नामनिर्देशित केलेल्या कक्ष अधिकाऱ्यांपैकी खालील तक्त्यात नमूद कक्ष अधिकाऱ्यांची नावे संबंधित प्रशासकीय विभाग/कक्ष अधिकारी यांनी केलेल्या विनंतीनुसार उपरोक्त प्रशिक्षणामधून वगळण्यात येत आहेत:-

| **अ.क्र.** | **श्री/ श्रीमती** | **कक्ष अधिकाऱ्यांचे नांव** | **विभाग** |
|---|---|---|---|
| १. | श्री | विजय रामदास यादव | महसूल व वन विभाग |
| २. | श्री | दशरथ भगवान पाडावे | वित्त विभाग |
| ३. | श्रीमती | अमृता भानुदास मनवे | कृषि व पदुम विभाग |
| ४. | श्री | अजित तातोबा कुंडले | उच्च व तंत्र शिक्षण विभाग |

३.    पदोन्नतीनंतरचे प्रशिक्षण हे राज्य प्रशिक्षण धोरण व महाराष्ट्र नागरी सेवा (कालबध्द प्रशिक्षण) नियम, २०२२ अन्वये देण्यात येत असून ते अनिवार्य आहे. तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (कालबध्द प्रशिक्षण) नियम २०२२ मधील नियम ५ (डी) मध्ये, **"शासकीय कर्मचाऱ्याने त्याच्या पदोन्नतीच्या दिनांकापासून एक वर्षाच्या कालावधीत पदोन्नतीनंतरचे प्रशिक्षण पूर्ण न केल्यास सदर प्रशिक्षण पूर्ण करेपर्यंत त्याची पुढील वार्षिक वेतनवाढ रोखण्यात येईल"** अशी तरतूद आहे.

३.१    उपरोक्त तरतूद विचारात घेता, अ.क्र.१ व २ येथे नमूद श्री.यादव व श्री.पाडावे, सर्व कक्ष अधिकारी यांना पदोन्नतीच्या आदेशाच्या दिनांकापासून ०१ वर्षे कालावधी पूर्ण झाला असल्याने व त्यांचे कक्ष अधिकारी पदावरील पदोन्नतीनंतरच्या प्रशिक्षणासाठी नामनिर्देशन करण्यात येऊनही त्यांनी पदोन्नतीनंरतचे प्रशिक्षण पूर्ण केले नसल्याने, त्यांची पदोन्नतीच्या आदेशापासून ०१ वर्षाचा कालावधी पूर्ण झाल्यानंतर त्यांना देय होणारी वार्षिक वेतनवाढ त्यांनी कक्ष अधिकारी पदावरील पदोन्नतीनंतरचे प्रशिक्षण पूर्ण करेपर्यत रोखण्याची कार्यवाही संबंधित प्रशासकीय विभागाने तात्काळ करावी व केलेल्या कार्यवाहीचा अहवाल सामान्य प्रशासन विभागास सादर करावा.

३.२    तसेच अ.क्र. ३ व ४ येथे नमूद कक्ष अधिकारी यापुढे आयोजित केलेल्या प्रशिक्षणास उपस्थित न राहिल्यास, **महाराष्ट्र नागरी सेवा (कालबध्द प्रशिक्षण) नियम २०२२ मधील नियम ५ मध्ये नमूद केलेल्या तरतूदीनुसार कारवाईस पात्र ठरतील व सदर प्रशिक्षण सत्रामधून नाव वगळण्याबाबतची त्यांची कोणतीही विनंती मान्य करण्यात येणार नाही**. सदर बाब संबंधित कक्ष अधिकाऱ्यांच्या निदर्शनास आणून देण्यात यावी.

४.    सदर पत्राची प्रत महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संगणक सांकेतांक २०२५०६०४१७५८२३६२०७ असा आहे. सदर पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

आपला
Digitally signed by GAJANAN SAHADEO PARAB
Date: 2025.06.04 18:07:59 +05'30'

**( ग.स. परब )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:- माहिती व पुढील कार्यवाहीस्तव**

१) संचालक, डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती
२) उप सचिव (कार्या-१२ अ), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
३) संबंधित अधिकारी (प्रशासकीय विभागामार्फत)
४) निवडनस्ती/प्रशा-२